**गडचिरोली व गोंदिया जिल्ह्यातील**
**<u>अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालाबाबत</u>**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : सीएफआर-१२१०/प्रक्र.६६/तेरा
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक २२ नोव्हेंबर, २०१०

संदर्भ : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः सीएफआर-१२९५/प्र.क्र३६/९५/तेरा, दिनांक ०१ फेब्रुवारी, १९९६

**<u>शासन परिपत्रक</u>**

नक्षलग्रस्त गडचिरोली व गोंदिया जिल्ह्यांसाठी विशेष उपाययोजना करण्याबाबत दिनांक २६.१०.२०१० च्या मंत्रीमंडळ बैठकीत मंत्रीमंडळाने दिलेल्या निदेशानुसार गडचिरोली व गोंदिया जिल्ह्यातील विकास कामे करणाऱ्या जिल्हास्तरीय विभाग प्रमुखांच्या (जिल्हा परिषद व पोलीस विभाग वगळून) वर्षभरातील कामकाजासंबंधाने लिहिण्यात येणारे गोपनीय अभिलेख त्यांच्या प्रतिवेदन अधिकाऱ्यांकडून लिहिले जात असताना त्यांनी संबंधित अधिकाऱ्यांबाबत, जिल्हाधिकाऱ्यांचे अभिप्राय विचारात घेण्याबाबत सूचना निर्गमित करण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

२. शासकीय अधिकारी/ कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासंदर्भात सर्वसमावेशक सूचना संदर्भाकित दिनांक ०१.०२.१९९६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या आहेत. त्यामधील सूचना क्रमांक ६२ मध्ये जिल्हाधिकाऱ्यांनी जिल्हास्तरावरील अधिकाऱ्यांच्या कामाबाबतचे मूल्यांकन संबंधित विभाग प्रमुखांकडे १५ एप्रिलपूर्वी गोपनीय पत्राद्वारे पाठवावे, अशी तरतूद आहे. तसेच, सूचना क्रमांक १० नुसार प्रतिवेदन अधिकाऱ्यांने प्रतिवेदन कालावधीत आढळून आलेल्या उल्लेखनिय गोष्टी व प्रतिकूल गोष्टी विचारात घेणेदेखिल अभिप्रेत आहे. **<u>त्यानुसार, गडचिरोली व गोंदिया जिल्ह्यातील विकास कामे करणाऱ्या जिल्हास्तरीय विभाग प्रमुख अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालाबाबत खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.</u>**

(अ) जिल्हाधिकारी, गडचिरोली व जिल्हाधिकारी, गोंदिया यांनी उपरोल्लेखित सूचना क्रमांक ६२ नुसार, त्यांच्या **जिल्हयातील विकास कामे करणाऱ्या जिल्हास्तरीय विभाग प्रमुखांच्या** (जिल्हा परिषद व पोलीस विभाग वगळून) वर्षभरातील कामकाजासंबंधाने अनुकूल/प्रतिकूल मूल्यांकन प्रत्येक वर्षी **संबंधितांच्या प्रतिवेदन अधिकाऱ्यांकडे १५ एप्रिलपूर्वी गोपनीय पत्राद्वारे पाठवावे.**

(ब) सबंधित प्रतिवेदन अधिकाऱ्यांनी उपरोल्लेखित सूचना क्रमांक १० नुसार, प्रतिवेदन कालावधीत आढळून आलेल्या इतर उल्लेखनिय गोष्टी व प्रतिकूल गोष्टी विचारात घेताना **जिल्हाधिकारी यांचा यासंदर्भातील अहवाल देखिल विचारात घ्यावा** व असा अहवाल विचारात घेतल्याचे सर्वसाधारण मूल्यांकनामध्ये नूमूद करावे. जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या अहवालात कळविलेल्या प्रतिकूल अभप्रायांशी सहमती दर्शवली नसल्यास तसे देखिल मूल्यमापनात स्पष्टपणे नमूद करावे.

(क) यासंदर्भात सर्व संबंधित मंत्रालयीन विभागानी त्यांच्या अधिपत्याखालील संबंधित प्रतिवेदन अधिकाऱ्यांच्या निदर्शनास या सूचना त्वरीत आणाव्यात व या सूचनांचे पालन होत असल्याची खातरजमा करावी.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रदर्शित करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१०११२२१७५७१३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही/-
**( के. पी. बक्षी)**
प्रधान सचिव (सेवा)

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मुख्य मंत्री यांचे सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मुख्य सचिवांचे सचिव
अपर मुख्य सचिव (गृह विभाग)
सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग **(परिच्छेद २(क) नुसार त्वरीत कार्यवाहीसाठी)**
सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२)
उप सचिव, गृह विभाग (वि.शा. १ ब)
विभागीय आयुक्त, नागपूर विभाग
जिल्हाधिकारी, गोंदिया
जिल्हाधिकारी, गडचिरोली
निवड नस्ती (कार्यासन साप्रवि/१३)